यवतमाळ आणि सांगली येथे शासकीय
कृषि महाविद्यालय स्थापन करण्यासाठी
मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१५१८/प्र.क्र.९९/७ अे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १३ ऑगस्ट, २०१८.

**प्रस्तावनाः**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे पेठ, ता. वाळवा, जि. सांगली येथे क्रांतीसिंह नाना पाटील कृषि महाविद्यालय तसेच डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत यवतमाळ येथे शासकीय कृषि महाविद्यालय स्थापन करण्यास राज्य मंत्रीमंडळाने नागपूर येथील दिनांक १९.०७.२०१८ च्या बैठकीत तत्वत: मान्यता दिली आहे. तसेच राज्य मंत्रीमंडळाच्या या बैठकीमध्ये, कृषि अभ्यासक्रमामध्ये केवळ पारंपारिक कोर्सेस न ठेवता नवीन तंत्रज्ञानाचा समावेश असणारे (उदा. बायोटेक्नॉलॉजिमधील) कोर्सेस घेणे आवश्यक आहे आणि यासाठी मंत्रिमंडळ उपसमिती नेमून कृषी महाविद्यालयांच्या अभ्यासक्रमात अदयावत कोणते कोर्सेस घ्यावेत याबाबत प्रस्ताव तयार करावा आणि तो सादर करुन अंतिम मान्यता घ्यावी असाही निर्णय झाला आहे. त्याअनुषंगाने मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे पेठ, ता. वाळवा, जि. सांगली आणि डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत यवतमाळ येथे शासकीय कृषि महाविद्यालय स्थापन करण्याबाबतच्या प्रस्तावावर राज्य मंत्रीमंडळाने नागपूर येथील दिनांक १९.०७.२०१८ च्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार खालीलप्रमाणे मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| मा. मंत्री (कृषि) | - | अध्यक्ष |
| मा. मंत्री (वित्त व नियोजन) | - | सदस्य |
| मा. मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण) | - | सदस्य |
| सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे | - | सचिव |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०८१३११५२४७५६०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bharati Dinesh Dhuri

Digitally signed by Bharati Dinesh Dhuri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac65e55bc2f86ec37c6f25108b6605bc20e71b4742dd20d7e8f5e14cda6a2a7f, cn=Bharati Dinesh Dhuri
Date: 2018.08.13 11:55:56 +05'30'

**( भारती दि. धुरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३) मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
५) मा. मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
७) मा. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८) सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
९) कुलगुरु/कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी/डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला
१०) निवडनस्ती (कार्यासन ७अे),मंत्रालय, मुंबई.